प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प, पेण, जि. रायगड या कार्यालयासाठी पेण जि. रायगड येथील आयुक्त (पशुसंवर्धन) महाराष्ट्र राज्य यांच्या नावे असलेल्या जागेपैकी २०.०० गुंठे जमिन महसूल विभागास प्रत्यार्पित करण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक: पविआ-१८२३/प्र.क्र. ३१९/पदु -३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ जूलै, २०२४.

वाचा-: १. दिनांक २५.०७.२०२३ रोजी मा. मंत्री (पदु) यांच्याकडे झालेली बैठक.
२. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, मुंबई यांचे जा. क्र. प्रासअपस /जागा/३४०७-३४०९/२०२४, दिनांक ३.७.२०२४ रोजीचे पत्र.
३. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण , ता. पेण, जि. रायगड यांचे क्र. शाआबा-२०२४/का-०४(१)/२००४, दि.३०.०७.२०२४ रोजीचे पत्र.

**शासन निर्णय:-**

मौजे पेण ग्रामिण, जि. रायगड येथील गट क्र. २५६ मध्ये १.५२ हेक्टर जमिन मा. आयुक्त, पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य यांच्या नावे आहे. सदर जागेत सघन कुक्कुटपालन विकास गट, जिल्हा कृत्रिम रेतन केंद्र व तालुका पशुवैद्यकीय सेवा चिकित्सालय कार्यरत आहेत.

२. मौजे पेण ग्रामिण, जि. रायगड येथील गट क्र. २५६ मधील १.५२ हेक्टर जमिनीपैकी २०.०० गुंठे जमिन प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांच्या नावे करण्याची विनंती प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, ता. पेण, जि. रायगड यांनी त्यांच्या वाचा क्र. ३ येथील पत्रान्वये केली आहे. तत्पूर्वी दिनांक २५.०७.२०२३ रोजी मा. मंत्री (पदु) यांच्याकडे झालेल्या बैठकीत पशुसंवर्धन विभाग व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांनी संयुक्त पाहणी करुन अहवाल सादर करावा, असे निर्देश देण्यात आले होते. त्यास अनुसरुन उपरोक्त वाचा क्र. २ येथील पत्रान्वये प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, मुंबई अहवाल सादर केला आहे.

३. उपरोक्त पार्श्वभूमीवर मौजे पेण ग्रामिण, जि. रायगड येथील गट क्र. २५६ मधील १.५२ हेक्टर जमिनीपैकी २०.०० गुंठे जमिन प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण

यांना देण्यासाठी महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.:-

(१) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांना देण्यात येणाऱ्या जमिनीची चतु:सिमा सहआयुक्त पशुसंवर्धन, मुबई व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांच्या उपस्थितीत व सहमतीने निश्चित करण्यात यावी.

(२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण यांना २०.०० गुंठे जमिन देताना पशुसंवर्धन विभागाच्या चालु असलेल्या प्रकल्पाच्या जैवसुरक्षेस बाधा पोहचणार नाही, यांची दक्षता घेण्यात यावी.

(३) सदर जागा देताना पशुसंवर्धन विभागाच्या भविष्यातील प्रस्तावित प्रकल्पास बाधा येणार नाही, याची ही दक्षता सहआयुक्त पशुसंवर्धन, मुबई यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२४१३२४२४१४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.07.24 13:39:10 +05'30'

**( नि.भा.मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१. अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, मुंबई विभाग, मुंबई.
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, पेण, जि. रायगड.
५. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव
६. निवड नस्ती- पदुम-३